असा. क्र. ३१ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

### प्राधिकृत प्रकाशन

शुक्रवार, फेब्रुवारी ६, २००४/माघ १७, शके १९२५

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

# भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ५ फेब्रुवारी २००४

### अधिसूचना

**मुंबई दारूबंदी कायदा, १९४९.**

क्रमांक बीपीए. १०९८/९/इएक्ससी-२.---ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनास असे वाटते की, महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ मध्ये सुधारणा करून खालील नियम तात्काळ अंमलात आणावेत आणि म्हणून मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई पंचवीस) (यात ज्याचा उल्लेख यापुढे उक्त अधिनियम असा केलेला आहे) चे कलम १४३ चे पोट-कलम (३) मधील परंतुकानुसार तरतूद केल्याप्रमाणे आधी प्रकाशित न करता तात्काळ अंमलात आणावे.

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम १४३ चे पोट-कलम (२) चा खंड (बी) नुसार आणि त्या बाबतीत शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे

महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी खालील नियम करीत आहे ते असे :—

१. या नियमांना महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्री नोंदवही इत्यादी) (सुधारणा) नियम २००४ असे संबोधण्यात यावे.

२. महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ च्या नियम १० मध्ये,—

(i) उप-नियम (१) मधील " सकाळी ११-३० ते दुपारी ३-०० आणि संध्याकाळी ६-३० ते रात्री ११-०० या कालावधीत " या शब्द आणि अंकाऐवजी " सकाळी ११-३० ते रात्री २३-०० या कालावधीत " असे वाचावे.

(ii) उप-नियम (१) मध्ये खालील परंतुक अंतर्भूत आहे :—

परंतु जर मुंबई, नवी मुंबई आणि ठाणे पोलीस आयुक्तांच्या परिक्षेत्रात अशा प्रकारच्या अनुज्ञप्ती असतील तर या नियमाच्या उप खंड (२) मधील तरतुदींच्या अधीन राहून विदेशी मद्य विक्रीसाठी दररोज सकाळी ११-३० पासून रात्री १-३० वाजेपर्यंतच्या कालावधीसाठी उघडे ठेवू शकतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. श्री. घाडगे,**

शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 5th February 2004

*NOTIFICATION*

BOMBAY PROHIBITION ACT, 1949.

No. BPA. 1098/9/EXC-2.—Whereas, the Government of Maharashtra considers that the following rules further to amend the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969 should be brought into force at once and, therefore, the rules should be made without previous publication as provided by the proviso to sub-section (*3*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949).

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (*b*) of sub-section (*2*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969, as follows, namely :—

1. These rule may be called the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) (Amendment) Rules, 2004.

2. In rule 10 of the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969,—

(*i*) in sub-rule (1), for the words, figures and letters " during the hours from 11-30 a.m. to 3-00 p.m. and from 6-30 p.m. to 11-00 p.m. " the words, figures and letters " during the hours from 11-30 to 23-00 " shall be substituted.

(*ii*) to sub-rule (1), the following proviso shall be added, namely :—

"Provided that, such licenced premises situated at Mumbai, Navi-Mumbai and Thane Police Commissionerate shall, subject to the provisions of sub-section (2) of this rule, be kept open every day during the hours from 11-30 to 1-30 (Mid-night) for the sale of foreign liquor ".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. S. GHADGE,
Deputy Secretary to Government.

## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ५ फेब्रुवारी २००४

### अधिसूचना

**मुंबई दारूबंदी कायदा, १९४९.**

क्रमांक बीपीए. १०९८/९/इएक्ससी-२.---ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनास असे वाटते की, महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ मध्ये सुधारणा करून खालील नियम तात्काळ अंमलात आणावेत आणि म्हणून मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई पंचवीस) (यात ज्याचा उल्लेख यापुढे उक्त अधिनियम असा केलेला आहे) चे कलम १४३ चे पोट-कलम (३) मधील परंतुकानुसार तरतूद केल्याप्रमाणे आधी प्रकाशित न करता तात्काळ अंमलात आणावे.

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम १४३ चे पोट-कलम (२) चा खंड (बी) नुसार आणि त्या बाबतीत शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी खालील नियम करीत आहे ते असे :--

१. या नियमांना महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्री नोंदवही इत्यादी) (सुधारणा) नियम २००४ असे संबोधण्यात यावे.

२. महाराष्ट्र विदेशी मद्य (रोख आणि विक्रीची नोंदवही इत्यादी) नियम १९६९ च्या नियम १० मध्ये,—

(i) उप-नियम (१) मधील " सकाळी १०-०० ते रात्री ८-३० या कालावधीत " या शब्द आणि अंकाऐवजी " सकाळी १०-०० ते रात्री २१-३० या कालावधीत " असे वाचावे.

(ii) उप-नियम (१) मध्ये खालील परंतुक अंतर्भूत आहे--

परंतु जर मुंबई, नवी मुंबई आणि ठाणे पोलीस आयुक्तांच्या परिक्षेत्रात अशा प्रकारच्या अनुज्ञप्ती असतील तर या नियमाच्या उप-खंड (२) मधील तरतुदींच्या अधीन राहून विदेशी मद्य विक्रीसाठी दररोज सकाळी १०-०० पासून रात्री २२-३० वाजेपर्यंतच्या कालावधीसाठी उघडे ठेवू शकतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**कृ. श्री. घाडगे,**
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 5th February 2004

*NOTIFICATION*

BOMBAY PROHIBITION ACT, 1949.

No. BPA. 1098/9/EXC-2.—Whereas, the Government of Maharashtra considers that the following rules further to amend the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969 should be brought into force at once and, therefore, the rules should be made without previous publication as provided by the proviso to sub-section (*3*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949).

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (b) of sub-section (*2*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby in the following rules further to amend the Maharashtra Foreign Liquor, (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969, as follows, namely :—

1. These rule may be called the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) (Amendment) Rules, 2004.

2. In rule 10 of the Maharashtra Foreign Liquor (Sale on Cash, Register of Sales, etc.) Rules, 1969,—

(*i*) in sub-rule (1), for the words, figures and letters " during the hours from 10-00 a.m. to 8-30 p.m." the words, figures and letters " during the hours from 10-00 a.m. to 21-30 p.m." shall be substituted.

(*ii*) to sub-rule (1) the following proviso shall be added, namely :—

" Provided that, such licenced premises situated at Mumbai, Navi-Mumbai and Thane Police Commissionerate shall, subject to the provisions of sub-section (2) of this rule, be kept open every day during the hours from 10-00 a.m. to 22-30 p.m. for the sale of foreign liquor ".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

K. S. GHADGE,

Deputy Secretary to Government.

---

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई